**अल्पसंख्याक कल्याणाकरीता मा.पंतप्रधानाच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हा स्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीतील नामांकित संस्थांचे प्रतिनिधींची सदस्य म्हणून नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१५/प्र.क्र.२४०/का-९,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ ऑगस्ट, २०१८.

**वाचा :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आरएमएन-२००८/प्र.क्र.३३/२००८/३५, दिनांक २६ मार्च, २००८.
२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक-अविवि-२०१०/प्र.क्र.३/१०/का-९, दिनांक २९ एप्रिल, २०११.
३) संचालक, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे क्रमांक ९/४५/२०१४-पीपी-II, दिनांक ३० नोव्हेंबर, २०१५ रोजीचे पत्र.
४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक : अविवि-२०१५/प्र.क्र.२४०/का-९, दिनांक १५ एप्रिल, २०१७

**प्रस्तावाना :-**

अल्पसंख्याकांच्या कल्याणाकरीता मा.पंतप्रधानाच्या नविन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी व राज्यातील अल्पसंख्याक समाजाच्या आर्थिक व शैक्षणिक उन्नतीसाठी तसेच स्थानिक अल्पसंख्याकांच्या समस्या तातडीने सोडविण्यासाठी प्रत्येक जिल्हयात जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समिती शासन निर्णय, दिनांक २९ एप्रिल, २०११ अन्वये स्थापन करण्यात आली होती. तथापि, संदर्भ क्र.३ येथील संचालक, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे दिनांक ३०.११.२०१५ च्या पत्रान्वये राज्य शासनास मा.पंतप्रधानाच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हास्तरीय समितीची पुनर्रचना करण्याबाबत सुचित केले आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.४, दिनांक १५.०४.२०१७ च्या शासन निर्णयान्वये, जिल्हास्तरीय अल्पसंख्याक विकास संनियत्रण समित्या बरखास्त करुन नव्याने संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली “जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समिती” स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. त्यानुसार नव्याने स्थापन करण्यात आलेल्या “जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समिती मध्ये संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी हे अध्यक्ष व जिल्ह्यातील अल्पसंख्याक कल्याणाशी संबंधित इतर अधिकारी, जिल्ह्यातील सर्व लोकसभा सदस्य, जिल्ह्यातील सर्व विधानसभा सदस्य, राज्यातील प्रत्येक जिल्ह्याकरीता केंद्र शासनाने नामनिर्देशन केलेले एक राज्यसभा सदस्य, ग्रामीण तसेच नागरी क्षेत्रातील अल्पसंख्याक कल्याणाशी संबंधीत स्थानिक पंचायत राज संस्थांचे प्रतिनिधी, तसेच जिल्ह्यातील अल्पसंख्यांकासाठी काम करणाऱ्या तीन नामवंत अशासकीय स्वयंसेवी संस्थाचे प्रतिनिधी यांचा सदस्य म्हणून समावेश केला आहे.

३. उपरोक्त नुसार शासन निर्णय, दिनांक १५.०४.२०१७ अन्वये, स्थापन केलेल्या जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीच्या रचनेतील (ई) येथील जिल्ह्यातील अल्पसंख्यांकासाठी काम करणाऱ्या नामवंत संस्थांचे प्रतिनिधींची नामनिर्देशने शासनस्तरावर प्राप्त झाली आहेत. त्यापैकी शासन मान्यता मिळालेल्या जिल्हानिहाय प्रतिनिधीची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

अल्पसंख्याक कल्याणाकरीता मा.पंतप्रधानाच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमांची प्रभावी अंमलबजावणी करण्याकरीता शासन निर्णय, दिनांक १५.०४.२०१७ अन्वये स्थापन केलेल्या जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीच्या रचनेमधील (ई) येथील जिल्ह्यातील अल्पसंख्याकासाठी काम करणाऱ्या खालील संस्थाच्या प्रतिनिधींची सदस्य म्हणून जिल्हानिहाय नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्ह्याचे नांव | प्रतिनिधीचे नांव | स्वयंसेवी संस्थेचे नांव |
|---|---|---|---|
| १ | मुंबई शहर | श्री.रमेश महेता | सिध्दीविनायक मित्र मंडळ |
| २ | मुंबई उपनगर | श्री.हाजी रशीद शेख | बाग-ए-मोहम्मदी मस्जिद मदरसा ट्रस्ट |
| ३ | ठाणे | श्री. मो.बिलाल शेख | जुमा मस्जिद ऑफ बाम्बे कोकणी जमात |
| ४ | पालघर | श्री.मो.मेराज खान | सय्यद अबूकर शाह रहमुल्लाहअलय ट्रस्ट |
| ५ | रायगड | श्री.शाहनाज मुकादम | हयातुल इस्लाम इस्लाम गरीब नवाज रह. अ. चॅरिटेबल ट्रस्ट |
| ६ | रत्नागिरी | श्री.जुल्फी पेवेकर | सेवन यंग स्टार सोसायटी |
| ७ | सिंधुदूर्ग | श्री.सरफराज नाईक | जमीअत उलमा संस्था |
| ८ | नाशिक | श्री.असलम कुरेशी | मुरादशाह बाबा ट्रस्ट |
| ९ | धुळे | श्री.रईस हिंदुस्थानी | दाता शैक्षणिक बहुउद्देशीय संस्था |
| १० | नंदूरबार | श्री.जाकीर पठाण | सर्वोदय शैक्षणिक व सांस्कृतिक संस्था |
| ११ | जळगाव | श्री.शेख इरफान नुरी | महफील-ए-फैज नुरी फाऊंडेशन |
| १२ | अहमदनगर | श्री.सलील बागवान | शरदचंद्रजी मोहनपवार सेवा भावी सामाजिक प्रतिष्ठान |
| १३ | पुणे | श्री.साजीद शिकलकार | एस.एम.सिकीलकर एज्युकेशन सोसायटी |
| १४ | सातारा | श्री.आरीफ सय्यद | दारुल उलुम कमरअली दरवेश मदरसा |

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | सांगली | श्री.सलीम पन्हाळकर | दारुल फलाह मदरसा ट्रस्ट |
| १६ | सोलापूर | श्री.मुखतार कोरबु | हजरत अबूबकर सिद्दीकी (रजि.) सेवा संस्था |
| १७ | कोल्हापूर | श्री.जाकीर जमादार | करुणालय सामाजिक संस्था |
| १८ | औरंगाबाद | श्री.नबी पटेल | सहाराए वैद्यकीय सेवा मंडळ |
| १९ | जालना | श्री.शेख इमाम | स्वप्नपूर्ती सांस्कृतिक व क्रीडा मंडळ |
| २० | परभणी | श्री.शाहेद शमीम खान | हाजी अ.रशीद चॅरिटेबल ट्रस्ट |
| २१ | हिंगोली | श्री.अशरफ पठाण | रहमानीया एज्युकेशन ॲन्ड वेल्फेअर सोसायटी |
| २२ | बीड | श्री. मो.अजहर मो.सलीम | स्व.अमोल भैया गलधर युवा मंच |
| २३ | नांदेड | श्री.अनीस शेख | जनआधार बहुउद्देशीय सेवाभावी संस्था |
| २४ | उस्मानाबाद | श्री.अतीक पटेल | जय किसान कृषी विज्ञान विकास मंडळ व वाचनालय |
| २५ | लातूर | प्रा.नजीब खान | मौलाना आझाद बहुउद्देशीय सेवाभावी संस्था |
| २६ | अमरावती | श्री.जाकीर जमाल | साबीर एज्युकेशन सोसायटी |
| २७ | बुलढाणा | श्री.मुख्यतार ठेकेदार | शेगांव कब्रस्तान ट्रस्ट |
| २८ | अकोला | श्री.शेरोद्दीन पंचगव्हान | जुबेदा खानम बहुउद्देशीय विकास संस्था |
| २९ | वाशिम | श्री.शेख इमदाद | बुलढाणा अर्बन बँक |
| ३० | यवतमाळ | श्री.बशीर शेख | आदर्श युवक बहुउद्देशीय संस्था |
| ३१ | नागपूर | ॲड अशफाक शेख | श्री.साईताज बहुउद्देशीय शिक्षण संस्था. |
| ३२ | वर्धा | श्री.बिस्मिला खान | अता खैर अपंग सेवाभावी संस्था |
| ३३ | भंडारा | श्री.मतीन शेख | मुस्लीम बहुउद्देशीय संस्था |
| ३४ | गोंदिया | श्री.अहमद माणीयार | गोंदिया मुस्लिम जमात |
| ३५ | चंद्रपूर | श्री.अमीन शेख | उस्मानिया मस्जिद कमेटी |
| ३६ | गडचिरोली | श्री.बबलु हुसौनी | हुसौनी दरबार शरीफ संस्था |

२. उपरोक्त प्रमाणे प्रति जिल्हा एका प्रतिनिधीची सदस्य म्हणून सदर समितीवर नियुक्ती करण्यात येत आहे. उर्वरित दोन प्रतिनिधींची नियुक्ती, शासन निर्णय दिनांक १५.०४.२०१७ मध्ये नमूद केलेल्या विहित पध्दतीने प्राप्त होणारी नामनिर्देशने तपासून शासन मान्यतेने यथावकाश करण्यात येईल.

३. जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीची कार्य सविस्तरपणे शासन निर्णय, दिनांक १५.०४.२०१७ अन्वये, विहित करण्यात आलेली आहेत. सदर समितीची बैठक जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली दर तिमाही आयोजित करण्यात येते. त्यानुसार सदर बैठकीस नियुक्त सदस्यांनी उपस्थित रहावे. याबाबत संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

४. उपरोक्त प्रमाणे नियुक्त केलेल्या नामांकित संस्थांच्या प्रतिनिधींना कोणतेही मानधन व बैठक भत्ता देय होणार नाही.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्रमांक २०१८०८२३१६४९५८०४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e786 0201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E12 49D39EC14A54419D0A13504B49333B23F92B5 8199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.08.24 12:34:16 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व संबंधित मा.लोकसभा / राज्यसभा सदस्य.
५) सर्व संबंधित विधानसभा सदस्य.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) संचालक, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, ११ वा मजला, पर्यावरण भवन, सी.जी.ओ. कॉम्प्लेक्स, लोधी रोड, नवी दिल्ली-११०००३.
९) सर्व विभागीय आयुक्त,
१०) सर्व जिल्हाधिकारी,
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१२) सर्व पोलीस आयुक्त / जिल्हा पोलीस अधिक्षक.
१३) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
१४) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद आर्थिक विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई.
१५) मुख्य कार्यकारी अधिकरी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद.
१६) कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई.
१७) अधिक्षक नि कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई.
१८) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) निवडनस्ती (कार्यासन-९).